सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी / जवान यांच्या विधवा/अवलंबितांना आर्थिक मदत देण्याबाबत - शहिद बारीकराव ज्ञानोबा वसेकर, जिल्हा-सोलापूर.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१५/(प्र.क्र. ८६/१५)/२८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: २४.०३.२०१५.

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम १०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ०४.१०.२०००.

२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैक २००२/९३३/प्र.क्र.८६/२००२/२८, दिनांक ०९.१२.२००३.

३) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/सैकवि-१६/५५, दिनांक ०२.०१.२०१५.

**शासन निर्णय**

संदर्भाधीन अ.क्र.(१) व (२) येथील शासन निर्णयांव्दारे जम्मू-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळील क्षेत्रात तसेच देशांतर्गत भागात निर्माण झालेल्या युध्दजन्य तणावाच्या परिस्थितीत/चकमकीत/अंतर्गत सुरक्षा मोहिमेअंतर्गत धारातीर्थी पडलेल्या, सैन्यदलातील/तत्सम निमलष्करी दलातील महाराष्ट्र राज्याचे अधिवासी असलेल्या सैनिकांच्या विधवांना/अवलंबितांना रु.५.०० लक्ष याप्रमाणे एकवेळची आर्थिक मदत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यानी संदर्भाधीन अ. क्र. (३) येथील दिनांक ०२.०१.२०१५ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्र राज्यातील जवानाच्या अवलंबितांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देत आहे.

**<u>धारातीर्थी पडलेले जवान (रुपये ५ लाख प्रमाणे आर्थिक मदत)</u>**

| अ. क्र. | नाव व पत्ता | मृत्यु दिनांक, मोहिम व ठिकाण | वारसाचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | १३९७१८९१-एन,<br>शहीद हवलदार बारीकराव ज्ञानोबा वसेकर,<br>मु.पो.पाटकूल, ता. मोहोळ, जि.सोलापूर. | १२.०९.२०११<br>ऑपरेशन फाल्कन,<br>(दमटेंग,<br>अरुणाचल प्रदेश) | १. श्रीमती तुळशी बारीकराव वसेकर, (वीरपत्नी) - रु. ३.०० लक्ष.<br>२. श्रीमती सावित्राबाई ज्ञानोबा वसेकर, (वीरमाता) - रु. २.०० लक्ष. |
| | | **एकूण** | रुपये ५.०० लक्ष |

२. धारातीर्थी पडलेल्या सदर जवानाच्या अवलंबितांना रु. ५,००,०००/- (रुपये पाच लक्ष फक्त) इतकी आर्थिक मदत प्रदान करावयाची असून संदर्भाधिन दि. ०४.१०.२००० च्या शासन निर्णयानुसार रु. ५,००,०००/- (रुपये पाच लक्ष फक्त) रक्कमेपैकी ४० % म्हणजे रु.२,००,०००/- (रुपये दोन लक्ष फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरित ६० % रक्कम म्हणजे रु. ३,००,०००/- (रुपये तीन लक्ष फक्त) मुख्यमंत्री सहायता ( कारगिल ) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु. २२.२२ कोटी रक्कमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद शासन अनुदानातून द्यावयाच्या रक्कमेपोटी होणारा खर्च रु. २,००,०००/- (रुपये दोन लक्ष फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२- सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००) (०४) देशांतर्गत सुक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५२६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर रक्कम रु. ५८,००,०००/- (रुपये अठ्ठावन्न लक्ष फक्त) इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, अहमदनगर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. मासैम१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२८, दिनांक ४.१०.२००० तसेच क्र.मासैम २००२/९३३/ प्र.क्र.८६/२००२/२८, दिनांक ०९.१२.२००३.मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२४१७१८४३१४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pradeep Darade
Date: 2015.03.24 17:29:06 +05'30'

( प्र.ल. दराडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२

४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

५. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,

६. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,

७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, औरंगाबाद,

९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,

१०. श्रीमती तुळशी बारीकराव वसेकर, (विरपत्नी), मु.पो.पाटकुळ, ता. मोहोळ, जि.सोलापूर,

११. श्रीमती सावित्राबाई ज्ञानोबा वसेकर, (वीरमाता), मु.पो.पाटकुळ, ता. मोहोळ, जि.सोलापूर,

१२. निवड नस्ती (२ प्रती).